**राज्याच्या परिवहन विभागात क्रीडा स्पर्धा व सांस्कृतिक कार्यक्रम आयोजित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०१२४/प्र.क्र.२६/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : १३ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई, शासन निर्णय क्र. क्रीडाधो-२०११/प्र.क्र.५५/११/क्रियुसे-१, दि.१४ जून, २०१२.
२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२३/प्र.क्र. १८/ई-८, दि. २३ फेब्रुवारी, २०२३.
३) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई, शासन निर्णय क्र. बीजीटी-१०२३/प्र.क्र.१९३/राउशु-१, दि. १६ जानेवारी, २०२४
४) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्र. पआका/का८(१)/रस्ता सुरक्षा क्रीडा स्पर्धा/२०२४/जा.क्र. ९८२, दि.१९ जानेवारी, २०२४.

**प्रस्तावना :-**

राज्यात क्रीडा संस्कृतीचे संवर्धन, प्रचार, प्रसार व जोपासना करणेसाठी पोषक वातावरण निर्माण करणेसाठी क्रीडा धोरण जाहिर करणारे महाराष्ट्र हे देशातील पहिले राज्य आहे. महाराष्ट्र राज्याच्या क्रीडा धोरणामध्ये क्रीडा विषयक पायाभूत सुविधांची निर्मिती, खेळाडूंचे प्रशिक्षण तसेच विकास या बाबींचा प्रामुख्याने समावेश आहे.

२. शालेय शिक्षण विभागाच्या संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयामधील परिशिष्ट "अ" मधील मुद्दा क्र. ४ मध्ये, देशाच्या व राज्याच्या विकासाच्या प्रक्रियेमध्ये आरोग्य संपन्न मनुष्यबळ प्रत्यक्ष अप्रत्यक्षरित्या परिणाम करत असल्याचे नमूद करुन कर्मचाऱ्यांची शारीरिक तंदुरुस्ती व कार्यक्षमता वाढीस लागण्यासाठी शासकीय, निमशासकीय, महामंडळ, सहकारी संस्था इ. ठिकाणी कार्यरत कर्मचाऱ्यांसाठी विविध क्रीडा स्पर्धांचे आयोजन संबंधित विभागामार्फत करण्याबाबत निर्देश दिले आहेत.

३. त्यानुषंगाने, राज्याच्या परिवहन विभागात राज्यस्तर व अधिनस्त असलेल्या विभागस्तरावरील अधिकारी/कर्मचारी यांच्याकडून क्रीडा स्पर्धा व सांस्कृतिक कार्यक्रम दरवर्षी घेण्याची मागणी वेळोवेळी केली जात होती. क्रीडा स्पर्धा आयोजित केल्यामुळे अधिकारी व कर्मचाऱ्यांची शारिरीक तंदुरुस्ती व कार्यक्षमता वाढीस हातभार लागेल, तसेच विविध ठिकाणी कार्यरत असलेल्या अधिकारी व कर्मचाऱ्यांमध्ये एकोपा, समन्वय व स्नेहभाव वाढीस लागेल. राज्याच्या परिवहन विभागात विविध खेळ प्रकारात वेगवेगळ्या स्तरावर प्राविण्य प्राप्त खेळाडू असल्याने दरवर्षी क्रीडा स्पर्धा घेतल्यामुळे अधिकारी व कर्मचाऱ्यांमध्ये उत्साह येईल व त्याचा उपयोग कार्यक्षमता वाढीकरीता होईल. त्यामुळे

अधिकारी व कर्मचाऱ्यांचा कामाचा व मानसिक ताण कमी होण्यास मदत होईल. त्याअनुषंगाने राज्याच्या परिवहन विभागात राज्यस्तरीय व विभागस्तरीय क्रीडा स्पर्धा व सांस्कृतिक कार्यक्रम आयोजित करण्यास प्रशासकीय मान्यता व त्यायोगे येणाऱ्या खर्चास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

राज्याच्या परिवहन विभागांतर्गत परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्तरावरील क्रीडा स्पर्धा व सांस्कृतिक कार्यक्रम ०३ दिवसांकरिता आयोजित करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. राज्यस्तरीय स्पर्धासाठी रु. १५ लक्ष तर प्रादेशिक विभागस्तरावर रु. ०५ लक्ष इतक्या मर्यादेत खर्च करण्यास वित्तीय मान्यता देण्यात येत.

२. प्रस्तुत प्रकरणी सन २०२४-२५ या वित्तीय वर्षापासून पुढील येणाऱ्या दरवर्षी विषयांकित राज्यस्तरीय स्पर्धेकरीता होणारा खर्च, "मागणी क्र. बी-०३ मुख्य लेखाशिर्ष २०४१ परिवहन विभाग (००), ००१ संचालन व प्रशासन, (०१) परिवहन आयुक्त, (०१) (०१) आस्थापना परिवहन आयुक्त (दत्तमत्त) (अनिवार्य) (२०४१ ००१८), २०- इतर प्रशासकीय खर्च" या लेखाशिर्षाखाली तसेच विभागीय स्तरावरील स्पर्धाकरिता होणारा खर्च, "मागणी क्र. बी-०३ मुख्य लेखाशिर्ष २०४१ (०२) प्रादेशिक कार्यालये (०२) (०१) प्रादेशिक कार्यालये (दत्तमत्त) (अनिवार्य) (२०४१ ००३६), २०- इतर प्रशासकीय खर्च" या लेखाशिर्षाखाली दरवर्षी उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

तथापि, सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरीता रस्ता सुरक्षा अभियानाचे औचित्य साधून परिवहन विभागांतर्गत विषयांकित क्रीडा स्पर्धेचे व सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन करण्यासाठी होणारा खर्च "मागणी क्र. बी-३ मुख्य लेखाशिर्ष (२०४१ ००३६), १३- कार्यालयीन खर्च याखाली उपलब्ध असलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

३. सदर प्रशासकीय व वित्तीय मान्यता वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१७५/२०२४/व्यय-८, दि. २७.०२.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार देण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०३१३१११७५०९३२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BHARAT RAMCHANDRA
LANGHI

Digitally signed by BHARAT RAMCHANDRA LANGHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=BHARAT RAMCHANDRA LANGHI
Date: 2024.03.13 12:11:46 +05'30'

**( भरत रा. लांघी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

३) मा. अपर मुख्य सचिव (परिवहन) यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

४) महालेखापाल- महाराष्ट्र १/२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर.

५) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

६) सह सचिव (व्यय/अर्थ), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

७) कक्ष अधिकारी, गृह विभाग/अर्थ-२. मंत्रालय. मुंबई.

८) निवडनस्ती (परि-४).